**निवडणूक विषयक बाबींकरिता धोरणात्मक निर्णय घेण्याकरिता सल्ला देण्यासाठी गठीत समितीच्या कामकाजाकरिता कर्मचारीवृंद तसेच मानधन व इतर सुविधा उपलब्ध करुन देण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सामान्य प्रशासन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण २०१८/१३५/प्र.क्र. ६५/३७**
मंत्रालय,मुंबई ४०० ०३२.
दिनांक : १७ ऑक्टोबर , २०१८

वाचा:- शासन निर्णय क्रमांक- संकीर्ण २०१८/१३५/प्र.क्र. ६५/३७, दि.२७.०३.२०१८

**प्रस्तावना:**

राज्यात तसेच देशात निवडणूका अधिक पारदर्शक व्हाव्यात,याबाबत सातत्याने चर्चा होते. त्या अनुषंगाने तसेच राज्यामध्ये विविध निवडणूकांमध्ये साधनसंपत्तीचा गैरवापर प्रतिबंधित करण्याच्या दृष्टीने अभ्यास करण्याकरीता तसेच लोकसभा व विधानसभा निवडणूका एकत्रित घेण्याबाबतच्या सुरु असलेल्या चर्चेच्या अनुषंगाने राज्यातील निवडणूका देखील एकत्रित घेता येतील किंवा कसे, याबाबत शासनास सल्ला देण्यासाठी उपनिर्दिष्ट शासन निर्णयान्वये मा.मंत्री (वित्त व नियोजन, वने) यांच्या अध्यक्षतेखाली व्दिसदस्यीय समिती गठीत करण्यात आली आहे. सदर समितीच्या कामकाजाकरिता कार्यालय, कर्मचारीवृंद तसेच इतर सुविधा उपलब्ध करून देण्याबाबतची बाब शासनाच्या विचाराधीन होती . त्या अनुषंगाने शासनाने खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्याचा निर्णय घेतला आहे :-

**शासन निर्णय : -**

१. सदर समितीचा कालावधी ६ महिन्याचा राहील.

२. समितीचे कार्यालय दालन क्र. ४०८, आर्केडीया, ४था मजला, नरिमन पॉईंट या इमारतीत ८६२ चौ.फू. रू.२००/-प्र.चौ.फू. प्रती माह सर्व मुल्यासहित, जि.एस.टी.वगळता या दराने सहा महिन्यांकरिता (सहा महिन्याचे भाडे अनामत रक्कम देऊन) भाडे तत्वावर घेण्याचे निश्चित केले आहे.

३. समितीचे सदस्य श्री.डी.के.शंकरन, माजी मुख्य सचिव यांना सदर कालावधीकरिता मानधन म्हणून रू.१,२५,०००/- एवढी ठोक रक्कम दरमहा अदा करण्यात येईल.

४. कार्यालयीन कामकाज पार पाडण्याकरिता समितीस खाली नमूद वेतनश्रेणीतून सेवानिवृत्त झालेले अधिकारी/कर्मचारीवृंद यांना शा .नि.सा.प्र.वि.संकीर्ण २७१५/प्र.क्र.१००/१३, दि.१७.१२.२०१६ मधील तरतुदीनुसार करार पध्दतीने उपलब्ध करून देण्यात येईल.

| अ.क्र. | पदनाम | वेतनश्रेणी | संख्या |
|---|---|---|---|
| १ | अतिरिक्त जिल्हाधिकारी /उपसचिव | १५६००-३९१००-७६०० | १ |
| २ | उच्चश्रेणी लघुलेखक | ९३००-३४८००-४४०० | १ |
| ३ | निम्नश्रेणी लघुलेखक | ९३००-३४८००-४३०० | १ |
| ४ | तहसिलदार | १५६००-३९१००-५००० | १ |
| ५ | सहायक कक्ष अधिकारी | ९३००-३४८००-४३०० | १ |
| ६ | लिपिक-टंकलेखक | ५२००-२०२००-१९०० | १ |
| ७ | शिपाई | ४४४०-७४४०-१३०० | १ |
| | एकूण | | ७ |

५. समितीच्या कार्यालयाकरीता १ लॅपटॉप,५ संगणक संच व २ प्रिंटर्स कम स्कॅनर्स, ५ दूरध्वनीसंच यांची खरेदी करुन समितीचे कामकाज संपुष्टात येताच ते सामान्य प्रशासन विभागाच्या गृह व्यवस्थापन शाखेकडे हस्तांतरीत करण्यात येतील.

६. समितीचे सदस्य श्री.डी.के.शंकरन, माजी मुख्य सचिव यांचे मानधन व अधिकारी व कर्मचारी यांचे परिश्रमिक, समितीच्या कार्यालयाचे ६ महिन्याचे भाडे अधिक जी.एस.टी.,अनामत रक्कम, कार्यालयीन साहित्याची खरेदी, दूरध्वनी, विज, इंटरनेट यांची प्रत्यक्ष वापराची देयके इत्यादी वर होणारा अंदाजे रु.६०.०० लक्ष इतका खर्च मागणी क्र.ए-४, २०५२ सचिवालयीन सर्वसाधारण सेवा ०९०, सचिवालय (००) ,(००) (०१) सामान्य प्रशासन विभाग (अनिवार्य) या लेखाशिर्षाखाली १३ कार्यालयीन खर्च , २०५२००२५ या उद्दिष्टाखाली खर्ची टाकण्यात यावा व चालू वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

हे आदेश वित्त विभागाच्या अनौ.सं.क्र.२२७/२०१८/व्यय-४, दि.१५.६.२०१८ मान्यतेने निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध असून त्यांचा संकेतांक २०१८१०१७१५५३३८४३०७ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Nand Kumar

Digitally signed by Nand Kumar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=School Education And Sports Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=c98b875883e76c14d91ed7b89546e6c11e439cad32d7f5cff487862cc567ee39, serialNumber=dcd3577ebf0e05e2a8b57095c152dc6cfb37c2bb83da197788645dd8a362ebc5, cn=Nand Kumar
Date: 2018.10.17 16:00:36 +05'30'

**( नंद कुमार )**

प्रधान सचिव व मुख्य राज्य शिष्टाचार अधिकारी

**प्रत:**

१. मा.राज्यपाल यांचे सचिव ,राजभवन,मलबार हिल,मुंबई ३५
२. मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव , मुख्यमंत्र्यांचे कार्यालय, मंत्रालय, मुंबई
३. मा. मंत्री (वित्त व नियोजन, वने), मंत्रालय, मुंबई यांचे खाजगी सचिव.
४. मा.मुख्य सचिव यांचे यांचे सह सचिव, मंत्रालय,मुंबई-३२
५. श्री.डी.के. शंकरन, माजी मुख्य सचिव, ३७ यशोधन, दिनशा वाच्छा रोड ,
६. सी.सी.आय, मुंबई-२०
७. सचिव, राज्य निवडणूक आयोग, महाराष्ट्र , पहिला मजला, नवीन प्रशासन भवन,
८. मंत्रालयासमोर मुंबई ३२,
९. मुख्य निवडणूक अधिकारी, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१०.प्रधान सचिव व मु.रा.अ. यांचे स्वीय सहाय्यक , सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
११. सह सचिव (कार्या-२४), उप सचिव (कार्या-३७) व (कार्या-२२), सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई,
१२.कार्यासन -३७ करिता संग्रहार्थ